**अतिरिक्त अर्थसंकल्प २०२४-२५ मध्ये खर्चाच्या नवीन बाबींचा समावेश करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ४/अर्थ-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३ मे, २०२४.

वाचा :- शासन परिपत्रक क्र.अर्थअं-२०१८/प्र.क्र.५८/अर्थसंकल्प-१, दिनांक ११.१०.२०२३.

## परिपत्रक

सन २०२४-२५ चा अंतरिम अर्थसंकल्प दिनांक २७ फेब्रुवारी, २०२४ रोजी विधानमंडळास सादर करण्यात आला आहे. या अंतरिम अर्थसंकल्पात फक्त अगोदरच कार्यवाहीत असलेल्या खर्चाच्या बाबींसाठी व कायम स्वरुपाच्या खर्चासाठी तरतूद केलेली आहे. कार्यक्रमांतर्गत तसेच अनिवार्य खर्चासाठी नवीन बाबींद्वारे आवश्यक असलेल्या खर्चाचा अंतरिम अर्थसंकल्पात अंतर्भाव केलेला नसल्याने विधानमंडळाच्या दिनांक १० जून, २०२४ पासून सुरु होणाऱ्या पावसाळी अधिवेशनात सादर करण्यात येणाऱ्या अतिरिक्त अर्थसंकल्पात नवीन बाबीसाठी तरतूद समाविष्ट करणे आवश्यक आहे. फेब्रुवारी, २०२४ मध्ये सादर करण्यात आलेला अंतरिम अर्थसंकल्प व जून, २०२४ मध्ये सादर करण्यात यावयाचा अतिरिक्त अर्थसंकल्प यावर विधानमंडळाच्या जून, २०२४ च्या अधिवेशनात चर्चा होईल.

२. अनिवार्य खर्चाच्या नवीन बाबींच्या संदर्भात सर्व मंत्रालयीन विभागांना असे सूचित करण्यात येत आहे की, ज्या बाबी अत्यावश्यक ठरविता येतील किंवा पुढील (२०२५-२६) वर्षापर्यंत स्थगित ठेवल्या जाऊ शकत नाहीत, फक्त अशाच अनिवार्य खर्चाच्या नवीन बाबी २०२४-२५ च्या अतिरिक्त अर्थसंकल्पात समाविष्ठ करण्यासाठी प्रस्तावित करण्यात याव्यात. ही बाब लक्षात घेता, सर्व मंत्रालयीन विभागांनी वर नमूद केलेल्या बाबीच्या संबंधातील अनिवार्य व कार्यक्रम खर्चाचे सर्व नवीन बाब प्रस्ताव सोबत जोडलेल्या **परिशिष्ट "अ"** मधील सूचना व कार्यपद्धती अवलंबून तसेच **परिशिष्ट-ब व क** मधील माहितीसह प्रथमत: वित्त विभागास नोंदणीसाठी पाठविणे आवश्यक आहे.

३. जून, २०२४ च्या अधिवेशनामध्ये अतिरिक्त अर्थसंकल्पात समाविष्ट करावयाच्या अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या नवीन बाबीचे प्रस्ताव नियोजन (विकास क्षेत्र कार्यासन) / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाकडे पाठविण्यासंबंधीचे वेळापत्रक खालीलप्रमाणे दिलेले आहे. नवीन बाबींच्या प्रस्तावांची नोंदणी BEAMS प्रणालीवर Online पध्दतीने करण्यात येणार असल्याने सर्व संबंधित विभागांनी विहित वेळापत्रकानुसार कार्यवाही करणे अत्यावश्यक आहे.

### कार्यक्रम

| | | |
|---|---|---|
| १) | कार्यक्रमावरील नवीन बाबीचे खर्चाचे प्रस्ताव, वित्त विभागांतर्गतच्या अर्थसंकल्प कक्षातील अर्थ-२ या कार्यासनात नोंदवून, नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभाग यांचेकडे अंतिमत: पाठविण्याची कालमर्यादा | सोमवार, दि.१३.०५.२०२४ |
| २) | कार्यक्रमावरील नवीन बाबीचे खर्चाचे प्रस्ताव नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभागाकडून वित्त विभागाला (व्यय शाखा) सादर करण्याची कालमर्यादा | शुक्रवार, दि.१७.०५.२०२४ |
| ३) | प्रस्ताव व्यय शाखेकडून अर्थसंकल्प शाखेकडे अंतिमत: प्राप्त होण्याची कालमर्यादा | शुक्रवार, दि.२४.०५.२०२४ |

### अनिवार्य

| | | |
|---|---|---|
| १) | अनिवार्य खर्चाचे नवीन बाबीचे प्रस्ताव, वित्त विभागांतर्गतच्या अर्थसंकल्प कक्षातील अर्थ-२ या कार्यासनात नोंदवून, वित्त विभागातील व्यय कार्यासनात पाठविण्याची कालमर्यादा | सोमवार, दि.१३.०५.२०२४ |
| २) | प्रस्ताव व्यय शाखेकडून अर्थसंकल्प शाखेकडे अंतिमत: प्राप्त होण्याची कालमर्यादा | शुक्रवार, दि.१७.०५.२०२४ |
| ३) | व्यय अग्रक्रम समितीची बैठक | बुधवार, दि.०५.०६.२०२४ |

**टिप:-** नवीन बाबींच्या प्रस्तावांची नोंदणी Online पध्दतीने करण्यात येत असल्याने सर्व नवीन बाबींच्या नस्त्या (**परिशिष्ट "ब" व "क"** मधील माहितीसह) व BEAMS प्रणालीवरील अहवाल वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडून तपासून विहित वेळेत वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील अर्थ-२ या कार्यासनाकडे प्राप्त झाला नाही, तर अशा नवीन बाबींचे प्रस्ताव Online प्रक्रियेमुळे स्विकारले जाणार नाहीत व त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील. त्यामुळे **विभागांनी सर्व प्रस्तावांची नोंदणी प्रथमत: वरीलप्रमाणे वित्त विभागाकडे करणे अनिवार्य आहे**.

४. हे परिपत्रक, नियोजन विभागाशी विचारविनिमय करून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०५०३१३४८४८९४०५ असा आहे. हे परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सहपत्र - परिशिष्ट अ, ब, क व ड आणि**
**विवरणपत्र १ अ, १ ब, १ क.**

PANDURANG
JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=476d37b83707d4fa8d081fe85145aa8df78154c98a1889573cd2900918d397e5, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=A256E2285AACFD4CDF1A5A468970133F213ECC0C01D84AA031BA50479F2EEF89, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2024.05.03 14:13:13 +05'30'

**( पां. जो. जाधव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
३) प्रधान सचिव / सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
४) सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७) सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव (वित्त), प्रधान सचिव (व्यय), सचिव (ले व को.), सचिव (वि.सु.), वित्त विभाग यांचे वरीष्ठ / स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
९) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प-२/४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) निवड नस्ती, अर्थसंकल्प-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

**परिशिष्ट - "अ"**

**( सर्वसाधारण सूचना )**

१. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८८/अर्थ-१, दिनांक २७ जानेवारी, २०१७ नुसार सन २०१७-२०१८ च्या आर्थिक वर्षापासून योजनेतर व योजनांतर्गत खर्चाचे वर्गीकरण अनुक्रमे अनिवार्य खर्च व कार्यक्रमांवरील खर्च असे करण्यात आलेले आहे. कार्यक्रमांवरील खर्चाच्या प्रस्तावास आवश्यकतेप्रमाणे नियोजन विभाग (विकास क्षेत्र कार्यासन) / सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक राहील.

२. विधानमंडळास सादर करण्यात येणाऱ्या नवीन बाबी विधानमंडळाकडून जुलै, २०२४ च्या दरम्यान पारीत होणार असल्याने अर्थसंकल्पात समाविष्ठ करावयाच्या सर्व नवीन बाबींमध्ये नव्याने निर्माण करण्यात येणाऱ्या पदांवरील वेतन भत्ते वगैरेंसाठी अंतर्भूत असलेला आवर्ती खर्च जास्तीत जास्त जुलै, २०२४ ते फेब्रुवारी, २०२५ या फक्त आठ महिन्यांपुरताच असावा.

३. नवीन बाब प्रस्ताव पाठविण्याअगोदर जरुर ती वित्तीय मंजूरी वित्त विभागाकडून घेतली आहे किंवा नाही हे स्पष्ट करावे. (कार्यक्रमांतर्गत बाबींसाठी अशी मंजूरी नियोजन विभाग / सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभागाकडून सुध्दा आवश्यक आहे) नवीन बाबींसाठी केलेली तरतूद वर्षभरात पूर्णपणे उपयोगात आणली जाईल अशी अपेक्षा असते, ती तशी खर्च करण्यात येईल याची खात्री करण्यात यावी.

४. नवीन बाबींचे प्रस्ताव सादर करण्यापूर्वी केंद्र पुरस्कृत बाबींसाठी / केंद्र पुरस्कृत बाबींच्या राज्य हिश्यासाठी आवश्यक असलेला पूर्ण निधी निश्चितपणे उपलब्ध केला आहे याची प्रशासकीय विभागाने खात्री करावी व पूर्ण निधी उपलब्ध केल्यानंतरच कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या नवीन बाबी प्रस्तावित कराव्यात.

५. ज्या बाबींसाठी आकस्मिकता निधीतून अग्रीम मंजूर झालेला आहे व त्या अग्रीमाची अजूनपर्यंत भरपाई केली गेलेली नाही, अशा बाबींसाठी कोणतीही तरतूद प्रस्तावित केली जाऊ नये अशी तरतूद प्रस्तावित करावयाची असल्यास योग्य वेळी ती पुरवणी मागणीद्वारे करावी.

६. कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या नवीन बाबींच्या संदर्भात "अंतरिम अर्थसंकल्प २०२४-२५", मध्ये अर्थसंकल्पित न झालेला निधी, नियोजन विभागाच्या सल्ल्याने जास्तीत जास्त प्रमाणात नवीन बाबीद्वारे अर्थसंकल्पित करण्याचा प्रयत्न करावा. जेणेकरुन जून, २०२४ अखेर विभागांतर्गत अर्थसंकल्पित न झालेला निधी शक्यतो शिल्लक राहणार नाही. अर्थसंकल्पित न झालेला निधी जास्त प्रमाणात शिल्लक राहिल्यास, पुढील अधिवेशनात पुरवणी मागण्यांची संख्या वाढते व वर्ष अखेरीस राज्याच्या आकस्मिकता निधीतून अग्रीमासाठी मोठ्या प्रमाणावर प्रस्ताव प्राप्त होतात. अशा बाबींसाठी अग्रीम मंजूर करण्याच्या प्रवृत्तीमुळे आकस्मिकता निधीवर भार पडतो व खरोखर तातडीच्या खर्चाच्या बाबींसाठी निधी उपलब्ध करुन देण्यात अडचणी निर्माण होतात. केवळ कार्यक्रम खर्चाचा निधी अर्थसंकल्पित व्हावयाचा शिल्लक राहिला आहे, म्हणून आकस्मिकता निधीतून अग्रीमाचे प्रस्ताव वर्षअखेरीस प्राप्त झाल्यास ते मान्य करणे या विभागास शक्य होणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी. यासाठी योग्य ती खबरदारी आताच घेण्यात यावी.

७. प्रस्तावित कार्यक्रम खर्चाच्या नवीन बाबी या राज्यांतर्गत खर्चाच्या आहेत किंवा केंद्रीय / केंद्र पुरस्कृत खर्चाच्या आहेत हे स्पष्ट करुन नेहमीची विहित विवरणपत्रे नियोजन विभागाच्या मान्यतेने या विभागाकडे वरील निर्देशित दिनांकापर्यंत पाठवावीत. नवीन बाबींच्या खर्चाच्या तरतूदींच्या प्रस्तावाबरोबरच त्या बाबींपासून मिळणाऱ्या जमा रकमा, वसुली रकमा, स्वायत्त संस्थाकडून मिळणारे अर्थसहाय्य वगैरे बाबी स्पष्टपणे त्यांच्या जमा लेखाशीर्षासहित नमूद केलेल्या असाव्यात. राज्यात स्थापित करण्यात आलेल्या विकास मंडळांना त्यांच्या कार्यक्षेत्रात येणाऱ्या खर्चाच्या बाबींकरिता अर्थसंकल्पात किती तरतूद करण्यात आलेली आहे, याची माहिती देणे अपेक्षित असल्यामुळे, नवीन बाबींमधील प्रस्तावाकरिता कार्यक्रम खर्चाच्या निधीपैकी अर्थसंकल्पात करण्यात येणाऱ्या तरतूदीची माहिती नियोजन विभागाकडे पाठवितांना विहित विवरणपत्र-१ अ, १ ब व १ क मध्ये देण्यात यावी. निधी अर्थसंकल्पित झाल्यानंतर उपरोक्त माहितीत काही बदल झाल्यास तसे नियोजन विभागास तद्नंतर त्वरीत कळविण्यात यावे.

८. सन २०१४-१५ पासून केंद्र शासनाच्या सूचनेनुसार अर्थसंकल्प बाहय केंद्र पुरस्कृत खर्चाच्या बाबींचा निधी राज्याच्या एकत्रित निधीतून अर्थसंकल्पित होत असल्याने त्यासाठी आवश्यक बाबींची पूर्तता करुन प्रस्ताव सादर करण्यात यावेत.

९. नवीन बाबीच्या प्रस्तावाच्या नस्तीवरील निर्देशपत्रावरच ठळक अक्षरात नवीन बाब प्रस्ताव (जून, २०२४) कार्यक्रम व अनिवार्य, आवर्ती / अनावर्ती, नवीन बाबीची रक्कम व संक्षिप्त विषय ठळक अक्षरात नमूद करणे बंधनकारक आहे.

१०. वित्त विभागाला प्राप्त होणाऱ्या नस्त्या सर्वसाधारणपणे नोंदणी शाखेत स्विकारल्या जातात. तथापि, नवीन बाब प्रस्तावाच्या नस्त्या वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेत प्रथमत: प्राप्त झाल्यास त्याची नोंद घेवून आवश्यक तेथे व्यय अग्रक्रम समितीची मान्यता घेणे व मान्य झालेले प्रस्ताव अर्थसंकल्पीय प्रकाशनात अंतर्भूत करणे शक्य होत असल्याने मंत्रालयीन विभागांनी परिपत्रकातील वेळापत्रकानुसार कार्यक्रम व अनिवार्य खर्चाच्या नवीन बाबींच्या नस्त्या, संबंधित कक्ष अधिकाऱ्याने स्वत: प्रत्यक्ष नस्ती व BEAMS प्रणालीवरील अहवालासह **(परिशिष्ट-"क")** तसेच या परिपत्रकातील सूचनांनुसार माहिती परिपूर्ण

असल्याची खात्री करुन (निर्देशपत्र तसेच **परिशिष्ट "ब" व "क"** मधील माहितीसह) वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडून **(परिशिष्ट-"ड")** तपासून त्या नस्त्या वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील अर्थ-२ या कार्यासनाकडे विहित करण्यात आलेल्या वेळापत्रकानुसार कार्यालयीन वेळेत नोंदवून वित्त विभागाला सादर कराव्यात. ज्या प्रशासकीय विभागांच्या कार्यक्रम खर्चाच्या नवीन बाबी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग या प्रशासकीय विभागांच्या मागणी क्रमांकाखाली येत असतील अशा प्रशासकीय विभागांनी BEAMS प्रणालीवरील माहितीची नोंदणी प्रकरणपरत्वे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग वा सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमध्ये प्रत्यक्ष जाऊन तेथे BEAMS प्रणालीवर नोंदणी करावी व त्याबाबतचा BEAMS प्रणाली अहवाल प्राप्त करुन घेऊन तो नस्तीसह वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनास विहित वेळेत सादर करावा.

११. प्रशासकीय विभागांनी वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनांना **नस्तीसह** ONLINE **नवीन बाब** सादर करण्याची कार्यपध्दती **परिशिष्ट-क** मध्ये देण्यात आलेली असून त्याप्रमाणेच विभागांनी कार्यवाही करावी.

१२. **नवीन बाब नस्तीवर वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील अर्थ-२ या कार्यासनाकडून टोकन क्रमांक नोंदविला नसल्यास अशा टोकन विरहित नस्त्या नियोजन/सामाजिक न्याय/आदिवासी विकास विभाग यांनी नवीन बाबीच्या छाननीसाठी स्विकारु नयेत. सर्व प्रशासकीय विभागांनी या सूचना लक्षात घेऊन कार्यवाही करावी.**

१३. विहित कालमर्यादेत कार्यवाही होण्याच्या दृष्टीने नवीन बाबींच्या प्रस्तावाची छाननी करताना वित्त विभागाने उपस्थित केलेले मुद्दे, इत्यादी बाबतची अधिकची माहिती तात्काळ सादर करुन प्रस्तावास आवश्यक ती माहिती कालमर्यादेत प्राप्त झाली किंवा नाही याची दक्षता प्रशासकीय विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांनी/नियंत्रण अधिकाऱ्यांनी घ्यावी. नवीन बाबीचा प्रस्ताव कार्यक्रम खर्चाचा असल्यास घटक निहाय (General/SCCS/TCS) निधी उपलब्ध आहे किंवा कसे? व त्यास संबंधित घटक निहाय विभागांची मान्यता (नियोजन/सामाजिक न्याय/आदिवासी विकास विभाग) आहे किंवा कसे? तसेच कार्यक्रम खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता व नवीन बाबीच्या समर्थनाची कारणमीमांसा स्पष्टपणे नमूद करणे अनिवार्य आहे. या कार्यवाही दरम्यान कोणताही प्रस्ताव उपरोक्त उणीवांमुळे अर्थसंकल्पीय प्रकाशनात अंतर्भूत होण्याचे राहू नये, याची दक्षता प्रशासकीय विभागाच्या संबंधित अधिकाऱ्यांनी/नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. प्रशासकीय विभागाच्या संबंधित सहसचिव/उपसचिव यांनी यासाठी स्वत: जातीने लक्ष घालावे.

१४. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक असंक. १०.०१/प्र. क्र. २९/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर, २००१ तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-०६१७/प्र.क्र.२०/आ.पु.क., दिनांक ९ जून, २०१७ अन्वये नवीन पदे निर्माण करण्याच्या प्रस्तावास वित्त विभागाची व कार्यक्रमांतर्गत खर्चाच्या योजनांच्या बाबतीत नियोजन व वित्त विभागाची मान्यता प्राप्त झाल्यावर मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या समितीकडे सखोल तपासणी करण्यासाठी पाठवून समितीच्या मान्यतेनंतर केवळ रुपये ७,६०० व त्यापेक्षा अधिक ग्रेड वेतन असलेल्या (असुधारित- सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे) नवीन पदनिर्मितीचे प्रस्ताव मंत्रिमंडळाच्या पूर्वसंमतीसाठी मंत्रिमंडळापुढे ठेवण्यात यावेत व अशाप्रकारे मंत्रिमंडळाची मान्यता असल्याशिवाय कोणतेही पद निर्माण करण्याचे आदेश काढू नयेत. नवीन पदे निर्माण करण्यासंबंधीच्या नवीन बाबी पाठविताना रुपये ७,६०० व त्यापेक्षा अधिक ग्रेड वेतन असलेल्या (असुधारित- सहाव्या वेतन आयोगाप्रमाणे) नवीन पदनिर्मितीच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता घेतली आहे, असे स्पष्ट प्रमाणपत्र देण्यात यावे. त्याचप्रमाणे, विभागाने आगामी वर्षाचे अंदाज/नवीन बाबी यांच्याशी संबंधित असलेले आपले सर्व प्रस्ताव सर्व बाबतीत परिपूर्ण असून त्याच्या पुष्ट्यर्थ आवश्यक ती माहिती देण्यात आलेली आहे, याची खात्री करून घ्यावी.

१५. स्थानिक क्षेत्रातील योजना असल्यास त्यानुसार शीर्षाच्या मागण्यांच्या विवरणपत्रात स्पष्टपणे उल्लेख करण्यात यावा.

१६. नवीन बाबी नस्तीसोबत सादर करण्यात येणारा BEAMS प्रणालीवरील अहवाल विभागाच्या सचिवांच्या किंवा विभागाचे प्रभारी मंत्री यांच्या मान्यतेने देण्यात यावा. विभागाने नवीन बाब प्रस्ताव वित्त विभागाला सादर करण्यापूर्वी विभागाच्या मंत्री महोदयांना अवगत करणे आवश्यक आहे.

१७. **प्रशासकीय विभागाकडून नस्तीमधील नवीन बाबीच्या प्रस्तावाची रक्कम व बिम्स प्रणालीवरील अहवालातील रक्कम यामध्ये विसंगती असल्यास बिम्स प्रणाली अहवालातील रक्कम नवीन बाबीच्या प्रस्तावाची छाननी करण्यासाठी ग्राहय धरण्यात येईल.**

१८. नवीन बाबींचे सभागृहापुढे समर्थन करावयाचे असल्याने, नवीन बाबींच्या आवश्यकतेच्या दृष्टीने लागणारा संपूर्ण व योग्य तो संबंधित तपशील अशा नवीन बाबींच्या मसुद्यात देण्यात यावा. **तसेच नस्तीमध्ये नवीन बाब प्रस्ताव या सोबत जोडलेल्या परिशिष्ट-ब (ANNEXURE - B) या नमुन्यातील माहितीसह परिपूर्ण असावा.**

*** *** *** ***

## परिशिष्ट - "ब"

१) विभागाचे नाव.

२) योजनेचे नाव व स्वरूप थोडक्यात.

३) मागणी क्रमांक / लेखाशीर्ष.

४) कार्यक्रम खर्च / अनिवार्य खर्च.

५) नवीन बाबीची रक्कम :- आवर्ती / अनावर्ती / एकूण.

६) कार्यक्रम खर्चाचा नवीन बाबीचा प्रस्ताव असल्यास त्यासाठी नियतव्यय उपलब्ध आहे वा कसे?

७) कार्यक्रम खर्चाचा नवीन बाबीचा प्रस्ताव असल्यास आवश्यकतेप्रमाणे नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभागाची मान्यता आहे वा कसे?

८) नवीन बाब प्रस्तावामध्ये खर्चाचा पूर्ण तपशिल उदा. निर्माण करावयाची पदे, वेतन व वेतनश्रेणी, तसेच इतर उद्दिष्टासाठी प्रस्ताव असल्यास आवर्ती, अनावर्ती व एकूण वार्षिक सरासरी खर्च, खरेदी करावयाच्या सामुग्रीचा तपशिल व त्या समर्थनार्थ कारणमिमांसा.

९) बांधकाम / प्रकल्पांचे नवीन कामांचे प्रस्ताव असल्यास त्यास प्रशासकीय मान्यता, आर्थिक वर्षात निश्चितपणे खर्च होणारी बांधकाम / प्रकल्पनिहाय मागणी व कामांची यादी.

१०) खर्चास मंजूरी देणारे शासकीय आदेश / प्रशासकीय मान्यता यांचे आदेश, क्रमांक व दिनांक.

११) नवीन बाबीमध्ये बांधिल खर्चाचा समावेश असल्यास, अशा बांधिल खर्चामुळे वसुलीच्या रुपाने मिळणाऱ्या रकमा, केंद्र शासन किंवा केंद्र शासनाच्या महामंडळाकडून मिळालेले अनुदान किंवा कर्ज ज्या लेखाशिर्षाखाली जमा करावयाचे असतील ते लेखाशिर्ष व त्यामुळे खर्चात कपात होते किंवा कसे याचा तपशिल.

१२) निधी आहरीत केल्यावर PLA/बँक खात्यात जमा होणार नाही याची खातरजमा केली आहे काय?

१३) नवीन बाबीव्दारे उपलब्ध होणारा निधी विहीत निविदा प्रक्रीया कार्यपध्दती / वित्तीय अधिकारांच्या मर्यादा / P.W.D. मॅन्युअल / C.V.C. ची मार्गदर्शक तत्वे / प्रचलित शासन निर्णय / नियमानुसार खर्च केला जाणार असल्याचे विभागाचे प्रमाणपत्र.

१४) नवीन बाबी - शासनाचे निर्णय / परिपत्रक वित्तीय नियमानुसार आहे किंवा नाही?

१५) प्रस्तावित नवीन बाबींसाठी प्रशासकीय, तांत्रिक, वित्तीय मान्यता आहे काय?

१६) नवीन बाबीचा BEAMS प्रणालीवरील अहवाल **(परिशिष्ट-क)** नस्तीसोबत ठेवण्यात यावा.

*** *** *** ***

**परिशिष्ट - "क"**

**सर्व संबंधित प्रशासकीय विभागाच्या अर्थसंकल्प शाखांनी BEAMS प्रणालीच्या LIVE MODE वर नवीन बाबींचा मजकूर नोंदविणे व तो वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडे नस्तीसह पाठविणे याबाबतची कार्यपध्दती**

१. संबंधित विभागाच्या अर्थसंकल्प शाखांनी प्रथमत: BEAMS प्रणालीच्या LIVE MODE वरील DRAFT MODE वर नवीन बाबींचा मजकूर अचूक नोंदवावा. यातील सर्व रकाने (FIELDS) भरणे अनिवार्य आहे. सदर माहिती तपासून व ती APPROVE करुन FINAL MODE ला पाठवावी. तद्नंतर सुधारणा असल्यास आवश्यक त्या सुधारणेसह FINAL MODE ला APPROVE करुन ती वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडे FORWARD करावी. तत्पूर्वी खाली नमूद केलेल्या नमुन्यातील बिम्स प्रणालीवरील अहवालाची प्रत काढावी.

२. ज्या प्रशासकीय विभागांच्या कार्यक्रम खर्चाच्या नवीन बाबी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग या प्रशासकीय विभागांच्या मागणी क्रमांकाखाली येत असतील अशा प्रशासकीय विभागांनी BEAMS प्रणालीवरील माहितीची नोंदणी प्रकरणपरत्वे सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग वा सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमध्ये प्रत्यक्ष जाऊन तेथे BEAMS प्रणालीवर नोंदणी करावी व त्याबाबतचा BEAMS प्रणाली अहवाल प्राप्त करुन घेऊन तो नस्तीसह वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनास विहित वेळेत सादर करावा.

३. या परिपत्रकातील सूचनांनुसार नवीन बाबीचा प्रस्ताव परिपूर्ण तयार करुन त्यास आवश्यकतेनुसार विभागाच्या सचिवांची अथवा प्रभारी मंत्री महोदयांची मान्यता घ्यावी. अशी मान्यता घेतलेल्या प्रस्तावाची नस्ती परिपत्रकातील सूचनांनुसार तयार करावी. तसेच BEAMS प्रणालीवरील अहवाल वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडे FORWARD करावा (परिशिष्ट-ड). त्यानंतर प्रशासकीय विभागाने नवीन बाबीची नस्ती व BEAMS प्रणालीवरील अहवाल वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडे तपासणीसाठी प्रत्यक्ष सादर करावा. तद्नंतर वित्त विभागाच्या संबंधित अर्थसंकल्प कार्यासनांनी सदर अहवाल नस्तीप्रमाणे योग्य आहे किंवा कसे त्याची तपासणी करावी. तपासणीअंती आवश्यक त्या सुधारणा करुन तो अहवाल वित्त विभागाच्या अर्थ-२ या कार्यासनाकडे FORWARD करावा. तद्नंतर संबंधित प्रशासकीय विभागांनी लगेचच नवीन बाबीची नस्ती व BEAMS प्रणालीवरील अहवाल वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील अर्थ-२ या कार्यासनाकडे प्रत्यक्ष सादर करावा. वित्त विभागाच्या अर्थ-२ या कार्यासनाने सदर नवीन बाबींच्या प्रस्तावासाठी BEAMS प्रणालीवर निर्माण झालेला (GENERATE) टोकन क्रमांक नस्तीवर नोंदवावा व सदर नस्ती आवश्यकतेप्रमाणे वित्त / नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास या विभागांकडे विहित मुदतीत पुढील कार्यवाहीसाठी पाठविण्याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांना सूचना द्याव्यात. संबंधित प्रशासकीय विभागांनी त्याप्रमाणे विहित मुदतीत तातडीने कार्यवाही करावी.

४. या कार्यवाहीमध्ये तांत्रिक अडचण उद्भवल्यास संबंधित प्रशासकीय विभागांनी तातडीने वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनाकडे किंवा अर्थ-४ या कार्यासनाकडे तात्काळ संपर्क साधावा. **BEAMS प्रणालीवरील अहवालामध्ये कोणती माहिती नोंदविणे आवश्यक आहे याबाबतचा संक्षिप्त गोषवारा खालील नमुन्यात दिलेला आहे. यातील नवीन बाबीचा विषय हा मराठी मधूनच भरणे आवश्यक आहे. तसेच या अहवालातील नवीन बाबीची रक्कम प्रस्तावाची छाननी / तपासणी करण्यासाठी अंतिम / ग्राहय धरली जाणार असल्याने नवीन बाबीची रक्कम बिम्स प्रणालीवरील अहवालात अचूकपणे नोंदवावी.**

५. सन २०१७-१८ पूर्वी नवीन बाबीच्या इंग्रजी व मराठी मसुद्यामध्ये तक्तात्मक स्वरुपाची माहिती उदा. पदांचा तपशिल, वेतनश्रेणी, बांधकामांच्या अनुषंगाने कामांची यादी, इत्यादींचा समावेश करण्यात येत होता. तथापि, आता BEAMS प्रणालीवरील अहवालातील संक्षिप्त इंग्रजी व मराठी मसुद्यामध्ये तक्तात्मक स्वरुपाच्या माहितीची नोंद ONLINE प्रणालीवर भरण्याची सुविधा नसल्याने अशी तक्तात्मक स्वरुपाची माहिती परिशिष्टाव्दारे (ANNEXURE) अलगरित्या HARD व SOFT COPY मध्ये BEAMS प्रणालीवरील अहवालासोबत वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित अर्थसंकल्प कार्यासनास प्रस्तावासोबत द्यावी. तसेच अशा परिशिष्टांचा उल्लेख BEAMS प्रणालीवरील अहवालातील संक्षिप्त इंग्रजी व मराठी मसुद्यामध्ये (ENGLISH / MARATHI TEXT) करण्यात यावा.

BEAMS प्रणालीवरील अहवाल (नमुना मसुदा)

**अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीच्या REPORT मध्ये NEW ITEM याअंतर्गत उपलब्ध होणारा खालील REPORT नस्तीसोबत जोडणे अनिवार्य आहे.**

**नवीन बाबींचे प्रस्ताव जून, २०२४**

| | | |
|---|---|---|
| १. | विभाग | |
| २. | नस्ती क्रमांक | |
| ३. | नस्तीचा ई-ऑफिस संगणक क्रमांक (COMPUTER NO.) | |
| ४. | कार्यक्रम (SCHEME) / अनिवार्य (COMMITTED) | |
| ५. | मागणी क्रमांक (ITEM NUMBER) | |
| ६. | मा.मंत्री | |

(Rs. In Thousand)

| Demand No. | Scheme Code | Detail Head (Object) | Current New Item Amount Total | Current New Item Recurring | Current New Item Non Recurring |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |
| | | | | | |
| | | Total | | | |

| | |
|---|---|
| नवीन बाबीचा विषय (मराठीमध्ये) | |

| | |
|---|---|
| English Text | (२५०० Characters) |

| | |
|---|---|
| Marathi Text | (३००० Characters) |

सह / उप / अवर सचिव / कक्ष अधिकारी
यांचे नांव व दूरध्वनी क्रमांक

**परिशिष्ट - "ड"**

| अ.क्र. | विभागाचे नाव | अर्थसंकल्प कक्ष |
|---|---|---|
| १. | सामान्य प्रशासन विभाग | अर्थ-१४ |
| २. | उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग | |
| ३. | अल्पसंख्यांक विकास विभाग | |
| ४. | मराठी भाषा विभाग | |
| ५. | इतर मागास बहुजन कल्याण विभाग | अर्थ-५ |
| ६. | महसूल व वन विभाग | अर्थ-६ |
| ७. | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | अर्थ-७ |
| ८. | पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | |
| ९. | महिला व बालकल्याण विभाग | |
| १०. | दिव्यांग कल्याण विभाग | |
| ११. | शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | अर्थ-८ |
| १२. | उच्च व तंत्रशिक्षण विभाग | |
| १३. | सार्वजनिक आरोग्य विभाग | अर्थ-९ |
| १४. | वैद्यकीय शिक्षण व औषधिद्रव्ये विभाग | |
| १५. | जलसंपदा विभाग | अर्थ-१० |
| १६. | गृह विभाग | अर्थ -११ |
| १७. | विधि व न्याय विभाग | |
| १८. | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | |
| १९. | सार्वजनिक बांधकाम विभाग | अर्थ-१२ |
| २०. | कृषि व पदुम विभाग (कृषि) | अर्थ-१३ |
| २१. | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | |
| २२. | कृषि व पदुम विभाग (पदुम) | अर्थ-१५ |
| २३. | नगर विकास विभाग | अर्थ-१६ |
| २४. | अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | |
| २५. | नियोजन विभाग | |
| २६. | ग्रामविकास विभाग | अर्थ-१७ |
| २७. | गृहनिर्माण विभाग | |
| २८. | मृद व जलसंधारण विभाग | |
| २९. | महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय | अर्थ-१८ |
| ३०. | वित्त विभाग | |
| ३१. | संसदीय कार्य विभाग | |
| ३२. | पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग | |
| ३३. | कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग | |
| ३४. | आदिवासी विकास विभाग | अर्थ-१९ |

| | | |
|---|---|---|
| १. | व्यय अग्रक्रम समितीसाठी पुरवणी मागणी नोंदणी | अर्थ-२ |
| २. | बीम्स प्रणाली | अर्थ-४ |

*** *** *** ***

**विवरणपत्र - १ अ**

**वार्षिक कार्यक्रम २०२४-२५**

**राज्यस्तरीय कार्यक्रम खर्च**

**वार्षिक कार्यक्रम २०२४-२५ मधील विकास क्षेत्र, उपक्षेत्र व प्रदेश निहाय अर्थसंकल्पीत करण्यात येणाऱ्या राज्यस्तरीय कार्यक्रम खर्चाचा नियतव्यय**

| विकास क्षेत्र / उपक्षेत्र कार्यक्रमाचे नाव | नवीन बाबीनुसार अर्थसंकल्पीत करावयाचा एकूण कार्यक्रमांतर्गत नियतव्यय (स्तंभ ३ ते ६) | मराठवाडा प्रदेश | विदर्भ प्रदेश | उर्वरित महाराष्ट्र प्रदेश | अविभाज्य नियतव्यय | प्रधान, गौण, उप व तपशीलवार शीर्ष | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |

**विवरणपत्र - १ ब**

**वार्षिक कार्यक्रम २०२४-२५**

**राज्यसंकोष (स्टेटपूल) कार्यक्रम**

**वार्षिक कार्यक्रम २०२४-२५ मधील विकास क्षेत्र, उपक्षेत्र व प्रदेश निहाय अर्थसंकल्पीत करण्यात येणाऱ्या राज्यसंकोष (स्टेटपूल) कार्यक्रमाचा नियतव्यय**

| विकास क्षेत्र / उपक्षेत्र कार्यक्रमाचे नाव | नवीन बाबीनुसार अर्थसंकल्पीत करावयाचा एकूण कार्यक्रमांतर्गत नियतव्यय (स्तंभ ३ ते ६) | मराठवाडा प्रदेश | विदर्भ प्रदेश | उर्वरित महाराष्ट्र प्रदेश | अविभाज्य नियतव्यय | प्रधान, गौण, उप व तपशीलवार शीर्ष | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |

**विवरणपत्र - १ क**

**वार्षिक कार्यक्रम २०२४-२५**

**जिल्हास्तरीय कार्यक्रम**

**वार्षिक कार्यक्रम २०२४-२५ मधील विकास क्षेत्र, उपक्षेत्र व प्रदेश निहाय अर्थसंकल्पीत करण्यात येणाऱ्या जिल्हास्तरीय कार्यक्रमाचा नियतव्यय**

| विकास क्षेत्र / उपक्षेत्र कार्यक्रमाचे नाव | नवीन बाबीनुसार अर्थसंकल्पीत करावयाचा एकूण कार्यक्रमांतर्गत नियतव्यय (स्तंभ ३ ते ६) | मराठवाडा प्रदेश | विदर्भ प्रदेश | उर्वरित महाराष्ट्र प्रदेश | अविभाज्य नियतव्यय | प्रधान, गौण, उप व तपशीलवार शीर्ष | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | | | | | |